सन २०१५-१६ या वर्षासाठी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास सहायक अनुदान (योजनांतर्गत) वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : राआआ २०१५/प्र.क्र.१२०/का-९**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २२ जून, २०१५.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२००९/प्र.क्र.१८८/०९/का-१, दि.२७ जुलै, २००९.

२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१०/प्र.क्र.८५/१०/का-९, दि.३१ डिसेंबर, २०१०.

३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२००९/प्र.क्र.१७/०९/का-९, दि.०५ जानेवारी, २०११.

४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१०/प्र.क्र.८५/१०/का-९, दि.१० जानेवारी, २०११.

५) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.मभायो-२०१३/प्र.क्र.६७/का-९, दि.२७ एप्रिल, २०१५.

६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५.

७) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.बीयुडी-२०१४/प्र.क्र.१४८ (भाग-२)/का-७, दि.२१ एप्रिल, २०१५.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी (१) पोलीस शिपाई भरतीपूर्व प्रशिक्षण वर्ग योजना, (२) मराठी भाषा फाऊंडेशन वर्ग योजना, (३) केंद्रीय लोकसेवा आयोग परीक्षा प्रशिक्षण वर्ग योजना (यशदामार्फत) व (४) स्पर्धा परीक्षा प्रशिक्षण योजना (राज्य प्रशासकीय सेवा प्रशिक्षण संस्थेमार्फत) या योजना संदर्भ क्र. १ ते ५ येथील शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आलेल्या आहेत. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाकडून राबविण्यात येत आहेत.

२. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाकडून राबविण्यात येत असलेल्या उपरोक्त योजनांच्या सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८, ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रु. २.८० कोटी (अक्षरी रू. दोन कोटी ऐंशी लक्ष फक्त) एवढी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. संदर्भ क्र. ६ व ७

येथील शासन परिपत्रकान्वये सदर निधीच्या ७०% मर्यादेपर्यंत योजनांतर्गत बाबींसाठी निधी वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानुसार या योजनेच्या सन २०१५-१६ या वर्षातील अंमलबजावणीसाठी सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे अर्थसंकल्पित तरतूदीच्या ७० % मर्यादेपर्यंत रु. १,९६,००,०००/- (अक्षरी रू. एक कोटी शह्यान्नव लक्ष फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी सन २०१५-१६ च्या मासिक निधीत विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे विहित मर्यादेपर्यंतच खर्च करावा. उपरोल्लेखित लेखानुदाच्या खर्चाचा तपशिल व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने शासनास विहित कालावधीत सादर करावे. तसेच हे अनुदान खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पिय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वेळोवेळी शासनाने या अनुषंगाने दिलेले सर्व निदेश/नियम/शासन निर्णय/आदेश आणि केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना व नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या निरीक्षणांचे पालन करण्यात यावे.

४. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८, ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यायत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१५०६२२१५५३४६१८१४ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2015.06.22 15:56:03 +05'30'

**(अशोक गायकवाड)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

३. मा.मंत्री/ राज्यमंत्री (अवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

५. अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

६. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,

७. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,

८. पोलीस आयुक्त (सर्व)

९. संचालक, लेखा व कोषागारे

१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१२.सर्व विभागीय आयुक्त,

१३.सर्व जिल्हाधिकारी,

१४.सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,

१५.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

१६.सर्व मंत्रालयीन विभाग

१७.उप सचिव, वित्त विभाग (व्यय-४), अर्थ-१४ नियोजन विभाग (का-१४७५) मंत्रालय, मुंबई,

१८. अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग/ अर्थसंकल्प शाखा, मंत्रालय, मुंबई,

१९.निवडनस्ती (कार्यासन-९)